**सन २०१५-१६ करीता जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना भागभांडवली अंशदान (राज्य योजना) - अंतर्गत निधीचे वितरण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.बियुडी ०६१५ / प्र.क्र.२२५/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक १९ ऑक्टोबर.२०१५

वाचा:- १. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.बैठक ०६१३/प्र.क्र.३७५/२ स दि.३१/ ३/२०१५.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.१७/४/२०१५

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३,दि.१/८/२०१५.

४. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.पुरक २०१५/प्र.क्र.१०२/२०१५/१७ स दि.१/८/२०१५

**प्रस्तावना:-**

राज्यातील बँकिंग परवाना नसलेल्या नागपूर,वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना त्यांचा CRAR किमान ७% होण्यासाठी शासकीय भागभांडवल व अनुदान अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याचा निर्णय शासनाने दि.३१.३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षासाठी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना भागभांडवल योजनेखाली मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षासाठी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना भाग भांडवली अंशदान या योजनेखाली रु. ६५९८ लाख एवढी तरतूद जुलै २०१५ मध्ये पुरक मागणीद्वारे मंजूर / अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्याबाबत खालील प्रमाणे निधीचे वितरण करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

या योजनेखाली वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र २ येथील शासन परिपत्राकामधील सूचनेनुसार परिच्छेद ७ ते १८ या अटींची तसेच या शासन निर्णयाच्या सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींची पूर्तता झाल्याने या योजनेखालील मंजूर अर्थसंकल्पित निधीच्या एकूण वार्षिक **तरतूदीच्या १०० %** वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून रु. ६५९८ लाख **(रुपये पासष्ट कोटी अठठयाण्णव लाख फक्त)** एवढा निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणाली (बीम्स) व्दारे वितरीत करण्यात येत आहे.

२. वरील योजनेवर होणारा खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा व तो पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

**मागणी क्र.व्ही-३**
मुख्य लेखाशिर्ष-४४२५ सहकारावरील भांडवली खर्च
(००)(१०७),पत सहकारी संस्थांमधील गुतवणूक
(०४)(०२) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना भागभांडवल
(राज्य योजनांतर्गत) (दत्तमत्त) (४४२५०७६८)
३२ - अंशदान

३. सदरचा निधी वितरीत करण्याकरिता लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाव्दारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा विनियोग विहीत केलेल्या अटी व शर्तीनुसार करण्यात यावे. तसेच योजनेवर झालेला विकासमंडळ निहाय खर्च व लाभार्थ्यांची संख्या याची माहिती नियोजन विभागाच्या योजना माहिती प्रणाली (MPSIMS) वर भरण्यासाठी न चुकता कार्यासन १७-स कडे सादर करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौसं- ४९६/अर्थ १३ दि.२९/९/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१०२११२५२१५५२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Shankar Bhujbal
Digitally signed by Ashok Shankar Bhujbal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Shankar Bhujbal
Date: 2015.10.21 12:54:18 +05'30'

**(अ.शं.भुजबळ)**
कक्ष अधिकारी

**प्रति,**

१ सह सचिव (व्यय-२ व अर्थ-१३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
२ सह सचिव (कार्या १४३१) नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
३ उपसचिव (अर्थसंकल्प-१७ स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
४ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे.
५ कोषागार अधिकारी, पुणे.
६ निवड नस्ती कार्या २ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.